हुडकोकडून प्राप्त झालेल्या कर्जावरील व्याज अदा करण्यास मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२२/प्र.क्र.२९९/आरोग्य-३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २१ मे, २०२४.

**वाचा :**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र. HUDCO-२०२१/C.R.२४३/Arogya ३ दि.१९ जानेवारी, २०२२.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण२०२२/प्र.क्र.२९९/आरोग्य ३ दि.२४ नोव्हेंबर,२०२२.
३) हुडको या वित्तीय संस्थेचे पत्र क्र. एच/एमआरओ/मांग/३४८/२०२४/३४० दि.१७ मे, २०२४.

**प्रस्तावना :**

राज्यातील सार्वजनिक आरोग्य विभागातंर्गत मंजूर आरोग्य संस्थांकरिता हुडको या वित्तीय संस्थेकडून पहिल्या टप्प्यामध्ये रु. ३९४८.०० कोटी कर्ज घेण्यासाठी ३ वर्षाचा अधिस्थगन कालावधी आणि त्यापुढे १० वर्ष परतफेडीचा कालावधी व ६.९५ टक्के व्याजदर तसेच इतर अटी व शर्तीसह दिनांक २१.१२.२०२१ अन्वये मा. मंत्रीमंडळ बैठकीत तत्वत: मान्यता देण्यात आली. त्याअनुषंगाने उपरोक्त वाचा येथील अ.क्र. १ अन्वये सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीत चालू व नविन आरोग्य संस्थांच्या बांधकामासाठी हुडको या वित्तीय संस्थेकडून कर्ज उपलब्ध करुन घेण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार हुडकोकडून कर्ज उपलब्ध करुन घेण्यात आले आहे. त्यानुसार वाचा येथील अ.क्र.२ अन्वये विभागातील अवर सचिव (रोख शाखा) आहरण व संवितरण अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई (डी.डी.ओ.कोड ७१०१००२३०५) यांना प्राधिकृत करणेबाबत आले आहे. त्याअनुषंगाने दिनांक ०१/०३/२०२४ ते ३१/०५/२०२४ या तीन महिन्याच्या कालावधी पर्यंतचे रु.२२,५८,६४,६३४/- (अक्षरी रुपये बावीस कोटी अठ्ठावन्न लक्ष चौसष्ट हजार सहाशे चौतीस फक्त) इतके व्याज भरण्याबाबत हुडको या वित्तीय संस्थेकडून मागणी प्राप्त झाली असून, सदर कर्जावरील व्याज अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मागणीनुसार सुरु असलेल्या आरोग्य संस्थांच्या बांधकामासाठी पहिल्या टप्प्यामध्ये ८.६१% (तीन वर्षासाठी निश्चित त्रैमासिक व्याज) देय आधारावर रु. १८६.९९ कोटी निधीचे कर्ज वितरीत करण्यास मान्यता दिली आहे, तसेच ९.१२% (तीन वर्षासाठी

निश्चित त्रैमासिक व्याज) देय आधारावर दुसऱ्या टप्प्यामध्ये दिनांक २९.०३.२०२३ रोजी रु.१०२.७१ कोटी निधीचे कर्ज, तसेच ९.१२% (तीन वर्षासाठी निश्चित त्रैमासिक व्याज) देय आधारावर तिसऱ्या टप्प्यामध्ये दिनांक १६.१०.२०२३ रोजी रु.२४०.४५ कोटी निधीचे कर्ज, तसेच ९.३८% (तीन वर्षासाठी निश्चित त्रैमासिक व्याज) देय आधारावर चौथ्या टप्प्यामध्ये दिनांक ०४.०१.२०२४ रोजी रु.२३५.०० कोटी निधीचे कर्ज तसेच ९.३८% (तीन वर्षासाठी निश्चित त्रैमासिक व्याज) देय आधारावर पाचव्य टप्प्यामध्ये दिनांक २६.०३.२०२४ रोजी रु.३००.०० कोटी निधीचे कर्ज हुडको या वित्तीय संस्थेकडून उपलब्ध करुन घेण्यात आले आहे.

३. हुडको या वित्तीय संस्थेकडून प्राप्त झालेल्या कर्जाचे माहे फेब्रुवारी, मे, ऑगस्ट व नोव्हेंबर अखेर पर्यंत व्याज भरण्याचे चार टप्पे आहेत. सदर महिन्याच्या अखेर व्याज हुडको या वित्तीय संस्थेस अदा न केल्यास त्यावर दंडणीय रक्कम भरावी लागणार असल्याची अट करारामध्ये नमूद आहे. त्यानुसार दिनांक ०१/०३/२०२४ ते ३१/०५/२०२४ या तीन महिन्याच्या कालावधी पर्यंतचे रु.२२,५८,६४,६३४/- (अक्षरी रुपये बावीस कोटी अठ्ठावन्न लक्ष चौसष्ट हजार सहाशे चौतीस फक्त) इतके व्याज भरण्याबाबत हुडको या वित्तीय संस्थेने मागणी दिलेली आहे. तसेच सदर व्याज माहे मे २०२४ अखेर पर्यंत भरणे आवश्यक आहे. तसेच सदर रक्कम जमा करण्याबाबतच्या खात्याची सविस्तर माहिती खालील प्रमाणे :

| | | |
|---|---|---|
| “Name of Beneficiary | : | Housing & Urban Development Corporation Limited |
| Bank Name | : | UNION BANK OF INDIA |
| Bank Branch | : | Moti Bagh, New Delhi |
| A/C No. | : | 468301010018045 |
| IFSC Code | : | UBIN0546836 (5th Character is zero)” |

४. हुडकोकडून प्राप्त होणाऱ्या कर्जावरील व्याज भरण्यासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये विभागाच्या मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र. आर-१, ०१, देशांतर्गत ऋणांवरील व्याज, २००, देशांतर्गत इतर ऋणांवरील व्याज, (००) भारित (००) (०१) आरोग्य संस्थांचे श्रेणीवर्धन व बांधकामासाठी हुडकोकडून घेतलेल्या कर्जावरील व्याज अनिवार्य, ४५, व्याज (२०४९२७८३) अंतर्गत रु.७०.०० कोटी निधी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हुडकोकडून प्राप्त झालेल्या दि. १७.०५.२०२४ च्या मागणीपत्रानुसार रु.२२,५८,६४,६३४/- (अक्षरी रुपये बावीस कोटी अठ्ठावन्न लक्ष चौसष्ट हजार सहाशे चौतीस फक्त) इतके व्याज हुडको या वित्तीय संस्थेस अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ नुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये अनिवार्य खर्चाकरीता निधी वितरणास

दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५८/अर्थबळ, दि. १३/०३/२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५२११५१०४७२६१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kavita Pradip Pise

Digitally signed by Kavita Pradip Pise
DN: cn=Kavita Pradip Pise, o, ou, email=kavita.pise@nic.in, c=US
Date: 2024.05.21 16:25:09 +05'30'

**( क. प्र. पिसे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
६. उप/सह सचिव, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. उप/सह सचिव, रोख-शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोख शाखा), सार्वजनिक आरोग्य विभाग मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी (अर्थबळ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालय राज्यस्तर), आयुक्तालय, मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३).